आगामी विधानसभा निवडणूक, २०१४ आदर्श आचारसंहितेच्या अंमलबजावणीबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः संकीर्ण-२०१४/प्र.क्र.१८४/समन्वय-२,

जी.टी.रुग्णालय संकुल इमारत, १० वा मजला,
मुंबई - ४०० ००१.
दिनांक : २२ सप्टेंबर, २०१४

**शासन परिपत्रक :**

आगामी विधानसभा निवडणूक, २०१४ च्या कार्यक्रमाची घोषणा भारत निवडणूक आयोगाने दिनांक १२ सप्टेंबर, २०१४ रोजी केलेली असून त्यानुसार सदर निवडणूकीची आदर्श आचारसंहिता संपूर्ण राज्यामध्ये दिनांक १२ सप्टेंबर, २०१४ पासून लागू झालेली आहे

२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई, आयुक्त, राज्य कामगार विमा योजना व तत्सम अधिनस्थ कार्यालयाकडून विभागाकडे विविध विषयासंबधातील प्रस्ताव शासनाच्या मार्गदर्शनासाठी तसेच शासन स्तरावरुन आदेश/निर्णय निर्गमित करण्यासाठी प्राप्त होत असतात. विभागाकडून अशा प्रकारच्या प्राप्त होणा-या प्रस्तावावर नियमित कार्यपध्दतीनुसार (रुटीन प्रोसिजर) कार्यवाही केली जात असते. परंतु असे असले तरी दिनांक १२ सप्टेंबर, २०१४ पासून आगामी विधानसभा निवडणूकीच्या अनुषंगाने राज्यामध्ये आदर्श आचारसंहिता लागू झाली असल्याने तिचे काटेकोरपणे पालन करणे व आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही याची खात्री करुन विभागाकडून पुढील कार्यवाही करणे आवश्यक आहे. सबब, सर्व कार्यासनांना या परिपत्रकान्वये सूचित करण्यात येत आहे की, विविध विषयाबाबतच्या प्रस्तावावर नियमित पध्दतीने कार्यवाही अनुसरुन अंतिम निर्णय घेण्यात आला असला तरी अंतिम आदेश निर्गमित करताना किंवा पुढील कार्यवाही करताना आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही याबाबत खातरजमा करुन आदर्श आचारसंहितेचे पालन होत आहे याबाबतची खात्री करण्याची दक्षता सर्व कार्यासनाने घेण्यात यावी.

३. विभागाच्या अधिनस्थ क्षेत्रीय कार्यालयास देखील याद्वारे सूचित करण्यात येत आहे की, आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही याची दक्षता घेऊनच संबंधित प्रकरणी आवश्यक ती पुढील कार्यवाही करण्याची दक्षता घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९२३१२२४५४१२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gote Ravindra P

Digitally signed by Gote Ravindra P
DN: CN = Gote Ravindra P, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Public Health Department
Date: 2014.09.23 13:15:05 +05'30'

**( रविंद्र गोटे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. आयुक्त, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
२. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
३. सर्व उप सचिव/अवर सचिव/ कक्ष अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (सार्व.आरोग्य) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. निवड नस्ती/समन्वय-२.